महाराष्ट्र राज्य नावीन्यता परिषदेच्या निर्देशानुसार करावयाच्या कार्यवाहीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण-१५१४/प्र.क्र.९६/७ अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ०५/०९/२०१४**

## परिपत्रक

**वाचा-** १) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.एसआयसी-२११३/प्र.क्र.१/२०१३/१४७१, दि.४ मार्च, २०१४.

२) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.एसआयसी-२११३/प्र.क्र.१/२०१३/१४७१, दि.२३ जुलै, २०१४.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक एसआयसी २११३/प्र.क्र.१/२०१३/१४७१ दि.४ मार्च, २०१४ अन्वये राज्यात स्टेट इनोव्हेशन कौन्सिलची स्थापना करण्यात आली आहे. राज्यात नवीन संकल्पनेचा आराखडा तयार करुन या संकल्पनांना मूर्तरुप देण्यासाठी पूरक वातावरण निर्मिती करणे, तसेच त्याबाबतचा प्रचार व प्रसार करण्यास सहाय्य करणे, नवीन संकल्पनांचा शोध घेण्यासाठी स्थानिक शाळा, विद्यापीठे तथा संशोधनात्मक संस्था यामधून तज्ञांद्वारे विद्यार्थी व तरुण वर्गाला मार्गदर्शन करणे व पर्यायाने देशाच्या आर्थिक विकासाला चालना देणे हे काम प्रामुख्याने स्टेट इनोव्हेशन कौन्सिलकडे सोपविण्यात आलेले आहे. प्रस्तुत निर्णयाच्या अनुषंगाने कृषि विभागाकरिता नावीन्यता उपगटाची स्थापना करणे व नावीण्यपूर्ण उपक्रम सुरु करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**१. महाराष्ट्र राज्य नावीन्यता परिषदेच्या निर्देशानुसार कृषि विषयाची संबंधीत उपगटाची स्थापना:-**

**अ) कृषि विषयाबाबतच्या नावीन्यता समितीच्या रचना -**

कृषि क्षेत्राच्या तातडीच्या व दिर्घकालीन नियोजनाचा आराखडा तयार करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अध्यक्षांनी सदर समितीत १ वरिष्ठ अधिकारी, २ अधिकारी व २-३ तरुण अधिका-यांची सदस्य म्हणून निवड करावी. याव्यतिरिक्त आवश्यकतेप्रमाणे सदस्यांची निवड करण्याचे अधिकार अध्यक्षांना राहतील. समितीच्या रचनेचे आदेश आयुक्त कृषि यांनी तात्काळ निर्गमित करावेत.

**ब) कृषि विद्यापीठांसाठीच्या नावीन्यता समितीची रचना -**

कृषि विद्यापीठाबाबतच्या तातडीच्या व दिर्घकालीन नियोजनाचा आराखडा तयार करण्यासाठी संबंधित विद्यापीठांच्या कुलगुरु यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अध्यक्षांनी सदर समितीत १ वरिष्ठ अधिकारी, २ मध्यम अधिकारी व २-३ तरुण अधिका-यांची सदस्य म्हणून निवड करावी. याव्यतिरिक्त आवश्यकतेप्रमाणे सदस्यांची निवड करण्याचे अधिकार अध्यक्षांना राहतील. समितीच्या रचनेचे आदेश कुलगुरु यांनी तात्काळ निर्गमित करावेत.

**क) महाबीज व महाराष्ट्र कृषि उदयोग विकास महामंडळ -**

महाबीज व महाराष्ट्र कृषि उदयोग विकास महामंडळाच्या तातडीच्या व दिर्घकालीन नियोजनाचा आराखडा तयार करण्यासाठी संबंधित व्यवस्थापकीय संचालक यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अध्यक्षांनी सदर समितीत १ वरिष्ठ अधिकारी, २ अधिकारी व २-३ तरुण अधिका-यांची सदस्य म्हणून निवड करावी. याव्यतिरिक्त आवश्यकतेप्रमाणे सदस्यांची निवड करण्याचे अधिकार अध्यक्षांना राहतील. समितीच्या रचनेचे आदेश व्यवस्थापकीय संचालक यांनी तात्काळ निर्गमित करावेत.

**ड) समितीची कार्यपध्दती व जबाबदारी -**

१) उपरोक्त प्रमाणे गठीत समितीची प्रत्येक महिन्यात एक बैठक आयोजित करण्यात यावी. समितीने कृषि विषयाशी संबंधीत तातडीचे व दिर्घकालीन नियोजन दि.३१ ऑक्टोबर, २०१४ पूर्वी तयार करावे व त्याचे सादरीकरण अ.मु.स. (कृषि) यांचेसमोर सादर करावे.

२) कृषि विभागाचे अंतीम ध्येय शेतक-यांची उन्नती हे आहे. कृषि विभागाच्या योजना, संशोधने शेतक-यांच्या दृष्टीने फायदेशीर असणे आवश्यक असल्याने शेतक-यांकडून/शेती उद्योजक यांचेकडून नाविण्यपूर्ण संकल्पना कशाप्रकारे प्राप्त होतील याचा समितीने विचार करावा आपला अहवाल दि.३० सप्टेंबर, २०१४ पूर्वी अ.मु.स.(कृषि) यांना सादर करावा.

**२. कृषि विभाग व कृषि विद्यापीठ नावीन्यता समितीने नावीण्यपूर्ण संकल्पना सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपध्दती**

**अवलंबवावी उदा. विभाग स्तर (कृषि विभाग)**

कृषि विभागांतर्गत राज्यात आठ विभागीय कृषि सहसंचालक कार्यालये आहेत. सदर कार्यालयाच्या अधिनस्त असणा-या अधिकारी/कर्मचारी यांनी सादर केलेल्या नावीन्यपूर्ण संकल्पनांमधून सर्वात चांगल्या संकल्पनेची निवड विभागीय कृषि सहसंचालक यांनी करावी. या कामी

त्यांनी त्यांच्या अधिनस्त असणा-या अधिक्षक कृषि अधिकारी यांचे सहाय्य घ्यावे. प्रत्येक महिन्यातील चांगली संकल्पना त्यांनी आयुक्त कृषि यांना प्रत्येक महिन्याच्या अंतिम आठवडयात ई-मेल द्वारे पाठवावी. कृषि आयुक्तालयातील अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांच्या संकल्पना विभागीय कृषि सहसंचालक, पुणे यांचेकडे सादर कराव्यात.

**राज्य स्तर समिती (कृषि विभाग)-** आयुक्त (कृषि) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने प्रत्येक महिन्यात प्राप्त झालेल्या नावीन्यपूर्ण संकल्पनेतून सर्वात चांगली संकल्पना निवडावी व ती संकल्पना, अधिकारी/कर्मचारी यांची (फोटो सहित असल्यास उत्तम) प्रसिध्दी कृषि विभागाच्या/कृषि विद्यापीठाच्या बेबसाईटवर करावी. अशाप्रकारे प्रत्येक महिन्यात निवडलेल्या सर्वात चांगल्या संकल्पनेमधून वर्षातील सर्वात चांगली संकल्पनेची निवड करावी. सदर संकल्पना सुचविण्या-या अधिकारी-कर्मचारी यांचा यथायोग्य सन्मान (प्रशस्तिपत्र इ.) करण्याबाबत समितीने कार्यवाही करावी.

**कृषि विद्यापीठे -** कृषि विद्यापीठांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील अधिकारी/कर्मचारी यांनी सादर केलेल्या नावीन्यपूर्ण संकल्पनांमधून सर्वात चांगल्या संकल्पनेची निवड कुलगुरु व त्यांच्या अधिनस्त असणा-या समितीने करावी. अशाप्रकारे प्रत्येक महिन्यात निवडलेल्या सर्वात चांगल्या संकल्पनेमधून वर्षातील सर्वात चांगली संकल्पनेची निवड करावी. सदर संकल्पना सुचविणा-या अधिकारी-कर्मचारी यांचा यथायोग्य सन्मान (प्रशस्तिपत्र इ.) करण्याबाबत समितीने कार्यवाही करावी.

**महाबीज व महाराष्ट्र कृषि उदयोग विकास महामंडळ-**

महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील अधिकारी/कर्मचारी यांनी सादर केलेल्या नावीन्यपूर्ण संकल्पनांमधून सर्वात चांगल्या संकल्पनेची निवड व्यवस्थापकीय संचालक व त्यांच्या अधिनस्त असणा-या समितीने करावी. अशाप्रकारे प्रत्येक महिन्यात निवडलेल्या सर्वात चांगल्या संकल्पनेमधून वर्षातील सर्वात चांगली संकल्पनेची निवड करावी. सदर संकल्पना सुचविणा-या अधिकारी-कर्मचारी यांचा यथायोग्य सन्मान (प्रशस्तिपत्र इ.) करण्याबाबत समितीने कार्यवाही करावी.

३. उपरोक्त प्रमाणे स्थापीत नावीण्यता उपगटाच्या अध्यक्षांनी त्यांचा तिमाही अहवाल (एप्रिल/जुलै/ऑक्टोबर/जानेवारी) अ.मु.स. (कृषि) यांना सादर करावा.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१६२३४८९९०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2014.09.06 15:51:35 +05'30'

**(क.य.वंजारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा,भोसलेनगर,पुणे.
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उदयोग विकास महामंडळ, कृषि उदयोग भवन, दिनकरराव देसाई मार्ग, आरे दुग्ध वसाहत, गोरेगाव, मुंबई ४०० ०६५.
५) कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६) कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
७) कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
८) कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
९) सर्व विभागीय कृषि सहसंचालक (द्वारा आयुक्त कृषि)
१०) सर्व जिल्हाअधिक्षक कृषि अधिकारी (द्वारा आयुक्त कृषि)
११) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) स्वीय सहाय्यक, अप्पर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१३) निवड नस्ती (कार्यासन ७अे)